**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीचा विकास करणे या योजनेंतर्गत अखर्चित असलेला निधी खर्च करण्यास परवानगी देणेबाबत.**
**जिल्हा परिषद, बीड.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन, क्रमांक: दवसु-२०१९/प्र.क्र. २६ /अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०६ फेब्रुवारी, २०१९.

__वाचा__ : अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र, दिनांक २९ ऑगस्ट, २०१८.

__ज्ञापन :__

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांना कळविण्यात येत आहे की, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीचा विकास करणे या योजनेंतर्गत सन २०१६-१७ साठी बीड जिल्हा परिषदेस मंजुर करण्यात आलेल्या निधीपैकी अखर्चित राहिलेला निधी रुपये १९,४५,२०,७१७/- (अक्षरी रुपये एकोणीस कोटी पंचेचाळीस लक्ष वीस हजार सातशे सतरा फक्त) सन २०१८-१९ या चालू वर्षात खर्च करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

२. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त निधी खर्च करावा.

३. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशीर्ष २२२५ ३०५५ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१६-१७ या वर्षातील अखर्चित राहिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर ज्ञापन वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक : १५ / अर्थोपाय, दिनांक ११ जानेवारी, २०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०६१४३९५५८५२२ असा आहे. सदर शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरी करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवांने

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2019.02.06 14:42:26 +05'30'

**(प्रशान्त पुं. वाघ)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
१. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
२. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा) - २, महाराष्ट्र, नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागरे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती /अजाक